**महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाकरीता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविवि-२०२३/प्र.क्र.५७/उद्योजकता**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा :** १) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र.कौविउ-२०२०/प्र.क्र.१३/उद्योजकता, दि.३०.०५.२०२२.
२) वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३.
३) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र.कौविवि-२०२३/प्र.क्र.५७/उद्योजकता, दि.१६ जून, २०२३.
४) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र.कौविवि-२०२३/प्र.क्र.५७/उद्योजकता, दि.०७ ऑगस्ट, २०२३.
५) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र.कौविवि-२०२३/प्र.क्र.५७/उद्योजकता, दि.१२ ऑक्टोबर, २०२३.
६) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र.कौविवि-२०२३/प्र.क्र.५७/उद्योजकता, दि.२९ डिसेंबर, २०२३.

**प्रस्तावना:**

राज्यातील युवक/युवतींना कौशल्याधारित रोजगारक्षम शिक्षण देण्यासाठी अर्थसहाय्यित तत्वावर सार्वजनिक कौशल्य विद्यापीठाची स्थापना, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ अधिनियम, २०२१ (सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ७ ) दिनांक २३ मार्च, २०२१ अन्वये करण्यात आली असून दि.६ एप्रिल, २०२१ रोजीच्या अधिसूचनेनुसार सदर अधिनियम दिनांक १४ एप्रिल, २०२१ पासून अंमलात आला आहे.

महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाचे कामकाज सुरु करुन विद्यार्थ्यांना दर्जेदार कौशल्य शिक्षण देण्याचा शासनाचा मानस आहे. कौशल्य विद्यापीठाचे कामकाज सुरु व्हावे या हेतूने विद्यापीठाच्या उभारणीकामी आवश्यक त्या बाबींसाठी निधीची आवश्यकता आहे. याकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये रु.७.३५ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. सन २०२३-२४ करिता आवश्यक निधी वितरणाच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाकरीता सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित रु.३१.०७ कोटी इतक्या तरतूदीपैकी बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध झालेला रु. २१,७४,९०,०००/- (रुपये एकवीस कोटी, चौ-ह्यात्तर लाख, नव्वद हजार फक्त) इतका निधी संदर्भांकित क्र.३, ४, ५ व ६ येथील शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आला आहे.

एकुण अर्थसंकल्पित निधीपैकी आता वित्त विभागाने बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध केलेला रु.०९,३२,१०,०००/- (रुपये नऊ कोटी, बत्तीस लाख, दहा हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**(रुपये हजारात)**

| **लेखाशीर्ष** | **सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित तरतूद** | **बी.डी.एस. प्रणालीवर यापूर्वी वितरीत करण्यात आलेली रक्कम** | **या शासन निर्णयाव्दारे वितरीत करण्यात येणारी रक्कम** | **एकुण वितरीत रक्कम** |
|---|---|---|---|---|
| २२५११०७६ | रु.३१,०७,०० | रु. २१,७४,९० | रु. ०९,३२,१० | रु. ३१,०७,०० |

२. उपरोक्त मंजूर निधी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठास प्रदान करण्यासाठी दि.३०.०५.२०२२ च्या शासन निर्णयान्वये आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तसेच सह/उप सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे. सदर रक्कम एकरक्कमी पध्दतीने विद्यापीठास अदा करण्यात यावी.

३. सदर वितरीत निधीच्या अनुषंगाने होणारा खर्च "झेड ए-०२, २२५१, सचिवालय सामाजिक सेवा, (०१)(०५) कौशल्य विकास विद्यापीठ कार्यक्रम (२२५११०७६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. विद्यापीठास उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी मंजूर उद्दीष्टांकरीता खर्च करुन त्यासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विद्यापीठाने शासनास सादर करावे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १३८/१४७१, दि.०५.०३.२०२४ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १०१/व्यय-६, दि.२८.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३२८१८१२०२७३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRANALI GOSAVI YADAV

Digitally signed by PRANALI GOSAVI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=cf3d0778b0543e10d0a60180dca4b868819cf9dfe0af7984474200631642de70, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=193E87F0B8C5F58941E4D2FBFDB3458DEAB3864A976F06D3984C8149BB888D55, cn=PRANALI GOSAVI YADAV
Date: 2024.03.28 18:22:18 +05'30'

**( प्रणाली गोसावी-यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे मार्फत)

**प्रत,**

१. अ.मु.स. (कौ.रो. उ.व ना. विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. कुलसचिव, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, एलफिन्स्टन तांत्रिक विद्यालय परिसर, महापालिका मार्ग, मुंबई-०१.
३. उप सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. वित्त व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, एलफिन्स्टन तांत्रिक विद्यालय परिसर, महापालिका मार्ग, मुंबई-०१.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
८.कार्यासन प्रशासन-३, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (उद्योजकता)